**<u>विशेष तपास पथक (SIT) स्थापन करणेबाबत.</u>**
**दिग्रस नगरपरिषद क्षेत्रातील महसूल विभाग, नगर परिषद दिग्रस, रेल्वे आणि विकास योजनेतील आरक्षित जागांवरील अवैध अभिन्यास पाडून मोठ्या प्रमाणावर अवैध भूखंड खरेदी-विक्री व्यवहार झाला असल्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग
पहिला मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२५/प्र.क्र.९७/ज-९,**
दिनांक : ०८ एप्रिल,२०२५

**<u>प्रस्तावना</u>** :-

महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२५ च्या पहिल्या (अर्थसंकल्पिय) अधिवेशनामध्ये सन्माननीय विधीमंडळ सदस्यांनी "दिग्रस नगरपरिषद क्षेत्रातील महसूल विभाग, नगर परिषद दिग्रस, रेल्वे आणि विकास योजनेतील आरक्षित जागांवरील अवैध अभिन्यास पाडून मोठ्या प्रमाणावर अवैध भूखंड खरेदी-विक्री व्यवहार झाला असल्याबाबत " उपस्थित केलेल्या लक्षवेधी सूचना क्र.१९९० च्या अनुषंगाने चर्चेच्या वेळी मा. मंत्री (महसूल) यांनी **"सदर प्रकरणी चौकशी करण्याकरिता महसूल विभाग, गृह विभाग व नगरविकास विभागांमार्फत संयुक्त विशेष तपास पथक (SIT) स्थापन करण्यात येईल "**, असे आश्वासन विधानमंडळ सभागृहात दिले आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

मा. मंत्री (महसूल) यांनी विधानसभेमध्ये दिलेल्या उपरोक्त आश्वासनाच्या अनुषंगाने " दिग्रस नगरपरिषद क्षेत्रातील महसूल विभाग, नगर परिषद दिग्रस, रेल्वे आणि विकास योजनेतील आरक्षित जागांवरील अवैध अभिन्यास पाडून मोठ्या प्रमाणावर अवैध भूखंड खरेदी-विक्री व्यवहार झाला असल्याबाबत यासंदर्भात सखोल चौकशी करण्याकरिता " विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे विशेष तपास पथक (SIT) स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीची रचना |
|---|---|---|
| १. | विभागीय आयुक्त, अमरावती | अध्यक्ष |
| २. | अपर जिल्हाधिकारी,यवतमाळ | सदस्य |
| ३. | अपर पोलीस अधीक्षक, यवतमाळ | सदस्य |
| ४. | सहसंचालक, नगर रचना, अमरावती विभाग | सदस्य |
| ५. | जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, यवतमाळ | सदस्य |
| ६. | सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी, यवतमाळ | सदस्य |

**२.** सदर समितीच्या कामकाजाकरिता ‘सदस्य सचिव’ म्हणून योग्य अधिका-याची नियुक्ती विभागीय आयुक्त, अमरावती हे करतील.

**३.** सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील, त्यात वाढ करण्याचे अधिकार शासनास राहतील.

**कार्यकक्षा**

**i.** दिग्रस नगरपरिषद क्षेत्रातील महसूल विभाग, नगर परिषद दिग्रस , रेल्वे आणि विकास योजनेतील आरक्षित जागांवरील अवैध अभिन्यास पाडून मोठ्या प्रमाणावर अवैध भूखंड खरेदी-विक्री व्यवहार झाला असल्याबाबत सखोल चौकशी करणे.

**ii.** सन्माननीय विधानसभा सदस्य यांनी उपरोक्त प्रकरणाबाबत उपस्थित केलेल्या तसेच भविष्यात समितीसमोर उपस्थित करतील अशा सर्व तक्रारींबाबत सविस्तर चौकशी करणे.

**iii.** सदर प्रकरण हे फौजदारी स्वरुपाचे असल्याने संबंधितांची सखोल चौकशी करुन जबाबदार असणा-यां विरुद्ध कायदेशीर कारवाई करणे.

**iv.** उपरोक्त प्रक्ररणातील संबंधित मुख्याधिकारी यांच्या बद्दल प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने अवैध मालमत्तेबाबत चौकशी करावी.

**v.** उपरोक्त विशेष तपास पथकाने चौकशीची कार्यवाही तीन महिन्यात पूर्ण करून त्याप्रमाणे सविस्तर अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०८१६०८२९३४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANADEV LAXMAN SUL

Digitally signed by DNYANADEV LAXMAN SUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=DNYANADEV LAXMAN SUL
Date: 2025.04.08 16:09:14 +05'30'

**(ज्ञा.ल.सुळ )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

**१)** मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.

**२)** मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

**३)** मा. उपमुख्यमंत्री(नगर विकास) यांचे सचिव

**४)** मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.

**५)** मा.राज्यमंत्री(महसूल) यांचे खाजगी सचिव

**६)** मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

**७)** मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

**८)** मा.अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक

**९)** प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई

**१०)** विभागीय आयुक्त, अमरावती

**१०**) निवडनस्ती (ज-९)